**केंद्र पुरस्कृत योजना सन २०१९-२०२०**
**"वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रम" अंतर्गत "माळढोक पक्षी"व "लेसर फ्लोरीकन" संरक्षण व संवर्धनाकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०१.२०/प्र.क्र.११/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १२ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :-**

१. वित्त विभागाचे, शासन परिपत्रक, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र. ४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९.
२. वित्त विभागाचे, शासन परिपत्रक, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९.
३. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ३४-१/२०१४ डब्ल्यूएल, दिनांक ०१.०१.२०२०.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.८/१५४६/१९-२०,दिनांक १४.०१.२०२०.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना- "वन्यजीव अधिवासाचे एकात्मिक विकास कार्यक्रमा" अंतर्गत "माळढोक पक्षी" व "लेसर फ्लोरीकन" संरक्षण व संवर्धनाकरिता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये रु. १२८.०० लक्षच्या कार्यबाबींस मंजूरी प्रदान केलेली आहे. त्यात केंद्र शासनाने ६०% हिस्सा अंतर्गत अनावर्ती व अनावर्ती कार्यबाबींकरीता रु. ६१.४४ लक्ष (सन २०१८-२०१९ मधील अखर्चीत रक्कम रु. १.०८१५४ धरुन) प्रथम हप्ता उपलब्ध करून दिला आहे. त्या अनुषंगाने अनावर्ती व आवर्ती सर्वसाधारण घटक कार्यबाबींसाठी राज्य शासनाचा ४०% हिस्सा अंतर्गत रु. ४०.९६ लक्ष निधी मुक्त करणे अपेक्षित आहे.

**शासन निर्णय-**

सदर शासन निर्णयान्वये संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर एकुण रक्कम रु.१०१.३१८४६ लक्ष खालील अटींचे अधिन राहून खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. प्रस्तावित खर्चापैकी **I)** अनावर्ती व आवर्ती सर्वसाधारण घटक कार्यबाबींसाठी **रु. ६०.३५८४६ लक्ष** (सन २०१८-२०१९ मधील अखर्चीत रक्कम रु. १.०१८५४ लक्ष वगळून) ६० % केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठीचा खर्च लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०३) वन्यजीवन व्यवस्थापन आणि संरक्षण (६० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ०७८४) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा

राज्य हिस्सा ४० % करीता रु. ४०.९६ लक्ष लेखाशिर्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (००)(१६) वन्यजीवन व्यवस्थापन आणि संरक्षण (४० % राज्य हिस्सा (२४०६ २३८४)

II. वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

III. प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

IV. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक :- ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१२१६५७४४५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2020.02.12 16:58:10 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने),
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
६) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयतस) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).